जिल्हा नियोजन समितीकडील रस्ते क्षेत्रासाठी लेखाशिर्ष ३०५४ व ५०५४ अंतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करावयाच्या रस्ते बांधणीबाबत मार्गदर्शक सूचना.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः जिवायो-२०१५/प्र.क्र.१९१ (भाग-३)/बांध-३**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४००००१

दिनांक: १५ फ़ेब्रुवारी, २०२२

**वाचा :-**

१) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः जिवायो-२०१५/प्र.क्र.१९१/पंरा-८, दि.०३.०९.२०१६

## शासन शुध्दीपत्रक :-

ग्रामविकास विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये जिल्हा नियोजन समितीकडील रस्ते क्षेत्रासाठी लेखाशिर्ष ३०५४ व ५०५४ अंतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करावयाच्या रस्ते बांधणीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

२. सदर शासन निर्णयामध्ये पुल/मो-या/साकव यांच्या पुनर्बांधणीच्या कामाचा समावेश आहे. मात्र त्यामध्ये दुरुस्तीची कामे करण्याचा समावेश नाही. सबब पुल/मो-या/साकव यांच्या दुरुस्तीची कामे जिल्हा नियोजन समितीमार्फ़त घेण्यास जिल्हा परिषदांना अडचणी येत असल्याची बाब निदर्शनास आली आहे. त्यामुळे संदर्भाधीन दि.०३.०९.२०१६ रोजीच्या शासन निर्णयामध्ये पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहेत.

| शा. नि. परि.क्र. | शासन निर्णयातील यापुर्वीची तरतूद | शासन निर्णयातील सुधारित तरतूद |
|---|---|---|
| परि-१ (१.१) | पुलांच्या नियमित सर्वेक्षणामध्ये जे पूल/ मो-या कमकुवत व असुरक्षित झाले असून त्यांची पुनर्बांधणी आवश्यक आहे असे पूलव मो-या **(दुरुस्ती नाही)** ज्या ग्रामीण मार्ग व इतर जिल्हा मार्गावरील वाहतुक पुरामुळे खंडीत होण्याचे प्रमाण हे विहित केलेल्या निकषांपेक्षा जास्त आहे, अशा रस्त्यांवरील पुलांची कामे. (सर्व रस्ते बारमाही वाहतुकीचे असावेत) | पुलांच्या नियमित सर्वेक्षणामध्ये जे पूल/मो-या कमकुवत व असुरक्षित झाले असून त्यांची **पुनर्बांधणी/दुरुस्ती** आवश्यक आहे असे पूल व मो-या ज्या ग्रामीण मार्ग व इतर जिल्हा मार्गावरील वाहतुक पुरामुळे खंडीत होण्याचे प्रमाण हे विहित केलेल्या निकषांपेक्षा जास्त आहे, अशा रस्त्यांवरील पुलांची कामे. (सर्व रस्ते बारमाही वाहतुकीचे असावेत) |

| शा. नि. परि.क्र. | शासन निर्णयातील यापुर्वीची तरतूद | शासन निर्णयातील सुधारित तरतूद |
|---|---|---|
| परि-१ (१.४) | कोकण विभागामधील कमकुवत व अरुंद साकव पुलांचे (पादचारी मार्ग) **पुनर्बांधकाम** करण्याचा सुध्दा त्यात समावेश असावा. शक्य असल्यास साकवाऐवजी एकपदरी (४.२५ मी. रुंद) पुलाचा समावेश करावा. | कोकण विभागामधील कमकुवत व अरुंद साकव पुलांचे (पादचारी मार्ग) **पुनर्बांधकाम/दुरुस्ती** करण्याचा सुध्दा त्यात समावेश असावा. शक्य असल्यास साकवाऐवजी एकपदरी (४.२५ मी. रुंद) पुलाचा समावेश करावा. |

३. संदर्भाधीन शासन निर्णयातील इतर तरतूदी पुर्वीप्रमाणेच कायम राहतील.

४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०२१४१३२४०६४०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

EKNATH KASHINATH GAGARE

Digitally signed by EKNATH KASHINATH GAGARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d9a3ccbc053d2cf9b4c30c85bb8db0e6c39331b90d48b0aba6cde387b5ec208c, pseudonym=E827291D35E203B1202123927394AD71E06D8BCA, serialNumber=6BC79F4A08CA2D5D74E02E7214F6AAD4EF7D9AFDEBA5BFCDEF24D45049099939, cn=EKNATH KASHINATH GAGARE
Date: 2022.02.15 11:38:39 +05'30'

**(एकनाथ गागरे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री/राज्यमंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) मा. सभापती/उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, मुंबई
६) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई
७) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद
८) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
९) मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य (सर्व), विधानमंडळ, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२) विभागीय आयुक्त, महसुल विभाग (सर्व)
१३) जिल्हाधिकारी (सर्व)
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१७) निवडनस्ती (बांध-०३)